"निसर्ग" चक्रीवादळामुळे बाधित झालेल्या नागरिकांना **एक विशेष बाब** म्हणून वाढीव दराने मदत देण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन

**महसुल व वन विभाग**

शासन निर्णय,क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.१३६/म-३

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : १० जून, २०२०

संदर्भ : १) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३ दिनांक १३.५.२०१५

२) शासन निर्णय,महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१७/प्र.क्र.२६७/म-३ दिनांक २५.०१.२०१८

**प्रस्तावना:**

दिनांक ३ जून, २०२० रोजी "निसर्ग" चक्रीवादळाचा तडाखा राज्यातील काही जिल्हयांमध्ये बसला आहे. या पुरपरिस्थितीमुळे सामान्य जनजीवन मोठया प्रमाणात विस्कळीत होवून मालमत्तेचेही मोठया प्रमाणात नुकसान झाले आहे. नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित झालेल्या व्यक्तींना विविध बाबींच्या नुकसानीसाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधी /राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी मधून केंद्र शासनाने विहित केलेल्या दरानुसार मदत देण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या मदतीच्या दरामध्ये केवळ याच घटनेसाठी एक विशेष बाब म्हणून वाढ करण्याचा निर्णय मंत्रिमंडळाच्या दिनांक ९ जून, २०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेण्यात आला आहे. सदर बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार संदर्भाधीन शासन निर्णयातील मदतीच्या दरामध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

निसर्ग चक्रीवादळामुळे राज्यातील विविध जिल्हयात झालेल्या नुकसानी बाबत संदर्भाधीन शासन निर्णयातील केवळ खाली नमूद केलेल्या बाबीसाठी वाढीव दराने मदत अनुज्ञेय करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | प्रचलित दर | मदतीचे वाढीव दर |
|---|---|---|---|
| १. | नैसर्गिक आपत्तीमध्ये घरे पुर्णत: क्षतीग्रस्त झाली असल्यास **कपडे** तसेच **घरगुती भांडी / वस्तुंकरिता अर्थ सहाय्य** | • प्रति कुटुंब रू २५००/- **कपडयांच्या नुकसानीसाठी**<br>• प्रति कुटुंब रू २५००/- **घरगुती भांडी/वस्तु नुकसानीसाठी** | • प्रति कुटुंब रू ५०००/- **कपडयांच्या नुकसानीसाठी**<br>• प्रति कुटुंब रू ५०००/- **घरगुती भांडी/वस्तु नुकसानीसाठी** |

| | | | |
|---|---|---|---|
| २. | पूर्णतः नष्ट झालेल्या झालेल्या पक्क्या व कच्च्या घरांसाठी मदत | • रू. ९५१००/- प्रति घर सखल भागातील<br>• रू.१,०१,९००/- दुर्गम भागातील | रू. १,५०,०००/- प्रति घर |
| ३. | अंशतः पडझड झालेल्या (किमान १५ %) पक्क्या घरांसाठी मदत | रू.६०००/- प्रति घर | रू. १५,०००/- प्रति घर |
| ४. | अंशतः पडझड झालेल्या (किमान १५ %) कच्च्या घरांसाठी मदत | रू.६०००/- प्रति घर | रू. १५,०००/- प्रति घर |
| ५ | नष्ट झालेल्या झोपडीसाठी मदत | रू.६०००/- प्रति घर | रू. १५,०००/- प्रति झोपडी |
| ६. | बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदत | • बहुवार्षिक पिके - रू १८०००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत | • बहुवार्षिक पिके - रू ५०,०००/- प्रति हेक्टर, २ हेक्टरच्या मर्यादेत |
| ७. | दुकानदार व टपरीधारक | -- | जे स्थानिक रहिवाशी आहेत, ज्यांचे नाव स्थानिक मतदार यादीत आहे व जे रेशनकार्ड धारक आहेत त्यांना पंचनाम्याच्या आधारे प्रत्यक्ष झालेल्या नुकसानीच्या ७५ टक्के रक्कम किंवा जास्तीत जास्त रू.१०,०००/- पर्यंत आर्थिक मदत देण्यात यावी. |

सदर मदतीची रक्कम प्रदान करताना संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या इतर अटी व शर्ती लागू राहतील.

२. SDRF/NDRF मधील विहित दरापेक्षा अधिक दराने देण्यात येणाऱ्या वाढीव मदतीची रक्कम राज्य शासनाच्या निधीतून खर्च करण्यात यावी.

३. वरील बाबीं व निकषा व्यतिरिक्त संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या इतर बाबींच्या नुकसानीसाठी सदर शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेले निकष व मदतीचे दर लागू राहतील.

४. पंचनामे करण्यात आल्यानंतर लाभार्थी निश्चित करण्यात यावेत. त्यानंतरच यासाठी निधी वितरित केल्यानंतर रक्कम आहरित करून लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये हस्तातंरित करावी. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय एक विशेष बाब म्हणून निर्गमित करण्यात येत असून तो केवळ " निसर्ग" चक्रीवादळामुळे बाधित झालेल्या नुकसानीकरिताच लागू राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ९९/२०२०/व्यय-९, दिनांक १०.०६.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००६१०१९२७२७८९१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( सु.ह.उमराणीकर )
उपसचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
४. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
५. अपर मुख्य सचिव (महसुल), महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
६. अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन, मुंबई
१०. प्रधान सचिव (नवि-२),नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
११. सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. सर्व विभागीय आयुक्त,
१४. आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१७. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१८. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२१. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२२. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई

२३. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
२४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
२५. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )